**पुणे महसूल विभागातील विभागीय आयुक्त, पुणे यांच्या जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
शासन निर्णय क्रमांक- जेपीएस-२०१७/प्र.क्र.२८/ई-८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक १८ ऑगस्ट, २०१७

**संदर्भ :-**

१. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांच्या कार्यालयाचे पत्र
क्र.साप्र-२/आर.आर/१३५३/१५/दि.०९/११/२०१५,
क्र. साप्र-२/कावि-५३९/१५, दिनांक ०८/०६/२०१६,
क्र. साप्र-२/कावि-७२५/१५, दिनांक १५/०७/२०१६,
क्र. साप्र-२/कावि-२२९/१७, दिनांक २७/०३/२०१७,
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.जेपीएस-२०१४/प्र.क्र.०९/ई-८, दिनांक २१/०४/२०१६
३. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वाहन-२०१६/प्र.क्र.५१/१६/विनियम, दिनांक २१/०१/२०१७
४. शासन ज्ञापन महसूल व वन विभाग क्र.जेपीएस-१००३/प्र.क्र.१३५/ई-८, दि.११/०८/२००४.

**प्रस्तावना :-**

पुणे महसूल विभागातील लेखाशिर्ष “२०५३- जिल्हा प्रशासन” या खाली वेतन आहरित करणाऱ्या १०५ क्षेत्रीय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांच्या अनुज्ञेयतेस संदर्भ क्र.२ येथील दिनांक २१/०४/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांच्या संदर्भाधीन क्र.०१ येथील पत्रांन्वये त्यांच्या क्र.एम एच- १२, बीए- ५००० या निर्लेखित केलेल्या वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. ४ वरील शासन ज्ञापनात सुधारणा करून पुणे महसूल विभागातील विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांच्या निर्लेखित एम एच- १२, बीए- ५००० या वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या रू.८,००,०००/- (रुपये आठ लाख मात्र) च्या खर्चास शासन पुढील अटींवर मंजूरी देत आहे.

१. राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने मान्यता दिल्यानुसार अनुज्ञेय वाहन दर करारानुसार नवीन वाहन खरेदी करण्यात यावे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील दिनांक २१/०१/२०१७ च्या शासन निर्णयान्वये विभागीय आयुक्तांसाठी रूपये आठ लाखांच्या मर्यादेत वाहनाची खरेदी करण्यात यावी. वाहन खरेदीसाठी मंजूर केलेल्या अनुदानामध्ये वाहनाची किंमत व करांचा समावेश आहे.

३. नवीन वाहन ज्या अधिकाऱ्यास मंजूर करण्यात आले आहे, त्या अधिकाऱ्याकडूनच त्याचा वापर त्याच कार्यालयाकरिता, शासकीय कामकाजासाठीच करण्यात यावा.

४. नवीन वाहन खरेदी केल्यानंतर त्यासंबंधी अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

२. सदर प्रस्तावातील खर्च लेखाशिर्ष “मागणी क्रमांक- सी- १- २०५३- जिल्हा प्रशासन” मधील (००) १०१ आयुक्त (०१) (०३) आयुक्त, पुणे १३- कार्यालयीन खर्च (२०५३ ०४२२)” याखालील अर्थसंकल्पीय तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं. क्र.१३९/विनियम, दिनांक २९/०३/२०१७ अन्वये दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०८१८१२०६३३८९१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sambhaji C Mondkar

Digitally signed by Sambhaji C Mondkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=498986dde0d282daba86b0acfc9c21d4f9594cc3a6d64857d6a53c9b86d5509b, cn=Sambhaji C Mondkar
Date: 2017.08.18 17:05:07 +05'30'

(सं.चं. मोंडकर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा)- १ महाराष्ट्र , मुंबई.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम), मंत्रालय, मुंबई- ३२.
सह सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
निवड नस्ती, कार्यासन /ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.